**दि.२३.१०.१९९२ ते दि.०३.०४.२००० या कालावधीत नियुक्त बिगर नेट/सेट अध्यापकांना सेवानिवृत्तीवेतनाचे लाभ अनुज्ञेय करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक-२०२०/प्र.क्र.५३/२०/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख:- २९.१०.२०२१

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. एनजीसी-१२०१/११८१५/(३८/०१)/विशि-४, दि.१८.१०.२००१.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. सकीर्ण-२०१२/(१३२/१२)/विशि-१, दि.२७.०६.२०१३

<u>प्रस्तावना:-</u>

शासन निर्णय दि.१८.१०.२००१ नुसार दि.१९.०९.१९९१ ते दि.११.१२.१९९९ या कालावधीत नियुक्त अध्यापकांच्या सेवा खंडीत न करता सेवानिवृत्तीपर्यंत सुरू ठेवण्याचा व त्यांना वार्षिक वेतनवाढी व्यतिरिक्त इतर कोणतेही लाभ (जसे पदोन्नती, वरिष्ठश्रेणी/निवडश्रेणी) अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच जे बिगर नेट/सेट अध्यापक विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेली नेट/सेट परीक्षा ज्या दिनांकास उत्तीर्ण होतील, त्या दिनांकापासून त्यांची सेवा कॅस अंतर्गत पदोन्नतीसाठी (वरिष्ठश्रेणी/निवडश्रेणी) लाभासाठी ग्राह्य धरली जाईल, असा निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयानुसार जे अध्यापक नेट/सेट परीक्षा उत्तीर्ण होणार नाहीत त्यांना केवळ अधिव्याख्याता पदाची वेतनश्रेणी व त्यावरील वार्षिक वेतनवाढी व्यतिरिक्त अन्य लाभ (जसे, वरिष्ठश्रेणी/ निवडश्रेणी) अनुज्ञेय नाहीत.

२. शासन निर्णय दि.२७.०६.२०१३ नुसार दि.२३.१०.१९९२ पूर्वी नियुक्त अध्यापकांना विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दि.१९.०९.१९९१ च्या अधिसूचनेतील तरतुदी लागू राहणार नाहीत. तसेच दिनांक २३.१०.१९९२ ते दि.०३.०४.२००० या कालावधीत नियुक्त ज्या बिगर नेट/सेट अध्यापकांनी त्यांच्या सेवाकालावधीत विद्यापीठ अनुदान आयोगाने अधिव्याख्याता पदासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता प्राप्त केली नाही. अशा अध्यापकांच्या सेवा शासन निर्णयाच्या दिनांकापासून काही अटींच्या अधीन राहून सर्व प्रयोजनार्थ ग्राह्य धरण्याचा निर्णय घेतला व त्यामुळे अशा अध्यापकांना शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली. सदरहू शासन निर्णय दि.२७.०६.२०१३ च्या विरोधात मा. उच्च न्यायालयात दाखल सर्व समान विषयांच्या याचिकांसह याचिका क्र.२०८२/२०१३ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.२३.१२.२०१५ रोजी निर्णय देऊन सदरचा शासन निर्णय वैध ठरविला आहे. सदरहू आदेशाविरुध्द मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका दाखल झाल्या असून सद्य:स्थितीत सदरहू प्रकरण मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायप्रविष्ठ आहे.

३. श्री. एम.डी. पाटील यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिका क्र.१३१६६/२०१७ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.०३.१०.२०१८ रोजी पारित केलेल्या आदेशान्वये मूळ नियुक्तीचा दिनांक ग्राह्य धरून सेवानिवृत्तीवेतन देण्याचे आदेश दिलेले असून सदरहू आदेश मा. सर्वोच्च न्यायालयाने कायम ठेवलेले आहेत. तसेच समान विषयाच्या इतर याचिकांमध्ये सुध्दा मा. उच्च न्यायालयाने याच निर्णयाचा आधार घेऊन याचिकाकर्ते यांना सेवानिवृत्तीवेतन देण्याचे आदेश पारित केलेले आहेत. यापुढेही अशा प्रकारच्या याचिकांमध्ये असे आदेश होऊ शकतात. त्यामुळे मा. उच्च न्यायालयाने याचिका क्र.१३१६६/२०१७ मध्ये पारित केलेले आदेश

मा. सर्वोच्च न्यायालयाने कायम ठेवले असल्याने शासन निर्णय दि.२७.०६.२०१३ मधील परिच्छेद क्र.१८ वगळून दि.२३.१०.१९९२ ते दि.०३.०४.२००० या कालावधीत नियुक्त बिगर नेट अध्यापकांना सेवानिवृत्तीवेतन अनुज्ञेय करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्याचा प्रस्ताव मा. मंत्रिमंडळाच्या दि.१३.१०.२०२१ रोजीच्या बैठकीत निर्णयासाठी ठेवण्यात आला होता. त्यानुषंगाने मा. मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. शासन निर्णय दि.२७.०६.२०१३ मधील परिच्छेद क्र.१८ वगळण्यात येत आहे.

२. शासन निर्णय दि.१८.१०.२००१ व दि.२७.०६.२०१३ नुसार दि.२३.१०.१९९२ ते दि.०३.०४.२००० या कालावधीत नियुक्त बिगर नेट/सेट अध्यापकांच्या सेवा सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत सुरू ठेवण्यात आलेल्या असल्याने अशा अध्यापकांना त्यांच्या मूळ नियुक्तीचा दिनांक ग्राह्य धरून तत्कालीन प्रचलित धोरणानुसार सेवानिवृत्ती वेतन देय राहील.

३. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५०/२१/सेवा-४, दि.१४.०५.२०२१ अन्वये तसेच विधी व न्याय विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.आर.आय.नं.२५२-२०२१/ई, दि.०५.०७.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच मा. मंत्रिमंडळाने दि.१३.१०.२०२१ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२११०२९१७४३०७१२०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.10.29 17:45:03 +05'30'

**(अजित बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. अध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४. मा. उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६. मा. उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
७. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई,
८. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
९. मा. कुलगुरू, सर्व अकृषि विद्यापीठे,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई-१, महाराष्ट्र,
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) मुंबई-१, महाराष्ट्र,
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र,
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र,

१४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१५. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,
१६. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१८. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१९. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२०. सहसचिव/उपसचिव (मशि/तांशि) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. सहसचिव (ई-शाखा) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. अवर सचिव (सेवा-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. निवड नस्ती (विशि-१)